**राज्यातील दिव्यांगांच्या कायम विना अनुदानित / विना अनुदानित दिव्यांग उपक्रमांना अनुदान तत्वावर मान्यता देणेबाबत निश्चित करण्यात आलेल्या धोरणातील तरतुदींनुसार करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक - इडीडी-२०२२/ प्र.क्र.६५/दि.क.१**
३१ / ३२ / ३५ "ए" विंग, मित्तल टॉवर,बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग,
नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०००२१.
दिनांक : ३० जुलै, २०२४.

**परिपत्रक**

मा. मंत्रिमंडळाने दिनांक ५ जुलै, २०२४ रोजीचे बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक: इडीडी-२०२२/ प्र.क्र.६५/दि.क.१, दिनांक १६ जुलै, २०२४ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयाव्दारे राज्यातील विनाअनुदानित/ कायम विनाअनुदानित दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतीगृहे, कार्यशाळा(प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतीमंदांची बालगृहे या दिव्यांग उपक्रमांना अनुदान तत्वावर मान्यता देणेबाबतचे धोरण / निकष निश्चित करण्यात आलेले आहेत. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांना सूचित करण्यात येते की, कायम विना/ विना अनुदानित दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान तत्वावर आणण्याबाबतचे प्रस्ताव उक्त धोरणातील तरतुदींची पुर्तता करुनच शासनाकडे सादर होतील, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

२. राज्यातील विनाअनुदानित/ कायम विनाअनुदानित दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतीगृहे, कार्यशाळा(प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे यांचेकडून यापुर्वी शासनास प्राप्त अनुदान मागणीच्या प्रस्तावांचे अनुषंगाने खालील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.:-

१) सदर धोरण अंमलात येण्यापूर्वी ज्या दिव्यांग उपक्रमांनी अनुदान तत्वावर मान्यता, मान्य विद्यार्थी संख्येच्या अनुषंगाने अनुज्ञेय पदे मिळण्यासाठी तसेच, अनुदान तत्वावर वाढीव विद्यार्थी संख्येस मान्यता देणेबाबत शासनाकडे मागणी नोंदविलेली आहे, अशा विशेष उपक्रमांची मागणी दि. १६ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे निकाली काढण्यात आली असून सदर शासन निर्णयातील तरतुदींच्या अनुषंगाने संबंधीत उपक्रम संचलित करणाऱ्या संस्थांनी अनुदान तत्वावर मान्यता मिळण्यासाठी नव्याने मागणी नोंदविणे बंधनकारक राहिल. त्यानुषंगाने विनाअनुदानित/ कायम विनाअनुदानित विशेष उपक्रमांचा एकत्रित प्रस्ताव आयुक्त, दिव्यांग कल्याण यांनी सदर शासन निर्णयातील तरतुदींनुसार शासनाच्या मान्यतेस्तव सादर करावा.

२) सदर दिव्यांग उपक्रमांना अनुदान तत्वावर आणण्याबाबतचे धोरण अंमलात येण्यापूर्वी ज्या दिव्यांग विशेष उपक्रमांना अनुदान मंजूर करण्यासंदर्भात तसेच, पद मान्यता देणेचे अनुषंगाने मा.न्यायालयाचे काही आदेश असल्यास दि. १६ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींस अनुसरुन सक्षम प्राधिकारी व वित्त विभागाच्या मान्यतेने प्रकरणपरत्वे उचित निर्णय घेणे आवश्यक आहे. सबब, मा. न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार प्रकरणपरत्वे याबाबतचा अहवाल आयुक्त, दिव्यांग कल्याण यांनी शासनाच्या मान्यतेस्तव सादर करावा.

३) सदर दिव्यांग उपक्रमांना अनुदान तत्वावर आणण्याबाबतचे धोरण अंमलात येण्यापूर्वी ज्या कायम विना अनुदान / विना अनुदान विशेष उपक्रमांना वाढीव विद्यार्थी संख्येस अनुदान तत्वावर मान्यता दिलेली आहे, अशा उपक्रमांची सदर दि. १६ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार पात्रता तपासून सदर उपक्रमांना अनुदान तसेच, अनुषंगिक पदमान्यतेसंदर्भातील एकत्रित प्रस्ताव शासनाच्या मान्यतेस्तव सादर करावा.

४) राज्यातील कायम / विना अनुदानीत दिव्यांग उपक्रमांना अनुदान तत्वावर मान्यता देणेबाबतचे धोरण दि. १६ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये निश्चित करण्यात आलेले असल्याबाबत प्रकरणनिहाय आयुक्तालय स्तरावरुन मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद व खंडपीठ नागपूर यांना कळविण्यात यावे.

३. सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७३०१५३०४५३९३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2024.07.30 15:45:58 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.,
२) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,. (आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे मार्फत)
३) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे मार्फत)
४) सहायक आयुक्त, मुंबई शहर/ मुंबई उपनगर,. (आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे मार्फत)
५) सर्व संबंधीत संस्था ( सबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत)
६) निवड नस्ती (दि.क.-१).